# महाराष्ट्र शासन

**गोपनीय**

क्रमांक : व्हीसीए-२००२/मु.स.५०२/प्र.क्र.७७/२००२/१६-अ,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १२/९/२००२

प्रति,

१) सर्व जिल्हाधिकारी,
महाराष्ट्र राज्य.

२) पोलीस अधिक्षक, ( मुंबई शहर व उपनगर वगळून),
महाराष्ट्र राज्य.

३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, पोलीस आयुक्तांचे कार्यालय,
मुंबई.

विषय : चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणीचा साक्षांकन नमुना प्रमाणित करण्याबाबत.

महोदय,

राज्य शासनांतर्गत पदावर नेमणूका करताना उमेदवारांचे चारित्र्य व पूर्वचारित्र्य याची पडताळणी करणे आवश्यक असते. ही पडताळणी मुंबई व मुंबई उपनगर जिल्हयाकरिता पोलीस आयुक्त आणि उर्वरित जिल्हयांकरिता जिल्हा पोलीस अधीक्षक यांच्याकडून करण्यात येते. या संदर्भात या विभागाकडून वेळोवेळी आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. गट-अ आणि गट-ब च्या पदावरील नियुक्तीपूर्वी तसेच गट-क आणि गट-ड च्या पदावरील नियुक्तीनंतर सदर साक्षांकन नमुना पडताळणी करुन विहित प्राधिकाऱ्यांकडून प्रमाणित करुन प्राप्त होणे आवश्यक असते.

२. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, राज्य शासनातील विविध नियुक्ती प्राधिकारी तसेच राज्य शासनाव्यतिरिक्त असलेल्या अन्य आस्थापना उदा.केंद्र शासन, सैनिकी सेवा, इ. यांच्याकडून प्राप्त झालेले साक्षांकन नमुने संबंधितांना तात्काळ प्रमाणित करुन प्राप्त होत नाहीत. तसेच पाठविण्यात आलेली माहिती अचूक नसते. यास्तव मला आपणास असे कळविण्याचे निदेश आहेत की, महाराष्ट्र राज्यात वास्तव्य करणाऱ्या ज्या उमेदवारांचे चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणीचे साक्षांकन नमुने सदर आस्थापनांकडून प्राप्त होतील, ते नमुने प्राप्त झाल्याच्या दिनांकापासून ३० दिवसांत माहिती अचूक भरून संबंधित आस्थापनांकडे परत पाठवावेत. तसेच असे नमुने पाठविताना सदर नमुना प्रमाणित करणाऱ्या अधिकाऱ्यांचे नाव, पदनाम, सही, शिक्का आणि गोल मुद्रा (Round seal) स्पष्टपणे दर्शवावे.

आपला,

(दे.त्र्यं.कुमावत)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

निवड नस्ती.

hadkar/hadkar letter57